**विभागीय चौकशी प्रकरणांचा जलदगतीने निपटारा होण्यासाठी उपाययोजना**

---------------------------------------

सर्वसाधारण त्रुटी आणि घ्यावयाची काळजी

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: वशिअ- १३१८/प्र.क्र.७९/११**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २२ जून, २०१८

<u>वाचा -</u>

(१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीडीआर- १००९/ प्र.क्र. ५०/०९/११, दिनांक १३ मे, २०१०

(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: वशिअ- १३१४/ प्र.क्र. २३/११, दिनांक १९ ऑगस्ट, २०१४

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ मधील तरतुदीनुसार तपशीलवार चौकशी करण्यासाठी चौकशी अधिकाऱ्याची नियुक्ती केली जाते. चौकशी अधिकाऱ्याकडे प्रकरण सोपविल्यावर त्यात काही त्रुटी आढळून आल्यास चौकशी अधिकाऱ्याकडून त्या शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याच्या निदर्शनास आणल्या जातात. त्यानंतर त्या त्रुटींची पूर्तता करण्यात काही कालावधी जातो आणि चौकशीची कार्यवाही खोळंबते. काही प्रसंगी अशा त्रुटी राहिल्यास त्यांचा अपचारी बचावासाठी उपयोग करतात. त्यामुळे चौकशीअंती दोषारोप सिद्ध होत नसल्याचे निष्कर्ष काढले जातात आणि चौकशी विफल होऊन वेळ व श्रम यांचा अपव्यय होतो. ही बाब विचारात घेता शिस्तभंगविषयक कारवाईच्या प्रकरणातील कोणत्याही टप्प्यावरील कार्यवाही ही नियम/ आदेशांतील तरतुदीनुसार केली जाईल आणि त्यात त्रुटी राहणार नाहीत याची संबंधित शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यांनी काळजी घेणे अत्यंत आवश्यक आहे. चौकशीच्या प्रकरणी आढळून येणाऱ्या त्रुटी व त्यासंबंधी शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यांनी घ्यावयाच्या काळजीसंबंधीचे स्पष्टीकरण यांचे विवरण पुढे दिले आहे:

| अ.क्र. | त्रुटी | स्पष्टीकरण |
| --- | --- | --- |
| (१) | **शासकीय कर्मचाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करण्यासंबंधी क्षेत्रिय कार्यालयातून प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांची शिस्तभंगविषयक प्राधिकरणाने तपासणी केलेली नसते. शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने संबंधित कर्मचाऱ्यावर बजाविलेल्या ज्ञापनासोबतची जोडपत्रे अपूर्ण व त्रोटक असतात.** | शिस्तभंगविषयक कारवाईच्या प्रकरणी क्षेत्रिय/ दुय्यम कार्यालयांकडून सक्षम शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याकडे प्रस्ताव सादर केल्यानंतर शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने प्रथम अशा प्रस्तावांची स्वतंत्रपणे तपासणी करणे आवश्यक आहे. अशी तपासणी करताना संबंधित प्रकरणी अनियमितता घडली आहे किंवा कसे, अनियमितता घडली असल्यास त्यास संबंधित कर्मचारी जबाबदार आहे किंवा कसे आणि सदर कर्मचारी जबाबदार असल्याचे दिसून येत असल्यास त्याच्याविरुद्ध चौकशीत दोषारोप सिद्ध करता येतील इतपत पुरावे उपलब्ध आहेत किंवा कसे या बाबी पाहणे अत्यंत आवश्यक आहे. त्यानंतर शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने ज्ञापनासोबतची जोडपत्रे अचूकरित्या तयार करावीत. क्षेत्रिय कार्यालयाकडून जोडपत्रांचे मसुदे प्राप्त झाले असल्यास त्यांची पडताळणी करुन त्यात सुधारणा कराव्यात. दोषारोप ज्ञापनासोबतची जोडपत्रे कशा रीतीने तयार करावीत याबाबतच्या तपशीलवार सूचना वरील (२) येथील शासन परिपत्रक, दिनांक १९ ऑगस्ट, २०१४ अन्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर सूचनांचे सर्व शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यांनी काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे. |

| अ.क्र. | त्रुटी | स्पष्टीकरण |
|---|---|---|
| (२) | **चौकशी अधिकाऱ्यास केवळ त्याच्या नियुक्तीचे आदेश पाठविले जातात. काही प्रकरणांत जोडपत्र- एक ते चार व जोडपत्र- चार मध्ये नमूद केलेली सर्व कागदपत्रे पाठविली जात नाहीत.** | या संदर्भात वरील (१) येथील शासन परिपत्रक, दिनांक १३ मे, २०१० मधील तरतुदींकडे लक्ष वेधण्यात येत आहे. त्यात नमूद केल्यानुसार, शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने चौकशी अधिकाऱ्याकडे चौकशीचे प्रकरण पाठविताना त्यात चौकशी अधिकाऱ्याच्या नियुक्ती आदेशासोबत खालील कागदपत्रे जोडली असल्याची खातरजमा करुन घ्यावी.<br>(एक) सादरकर्ता अधिकाऱ्याच्या नियुक्तीचे आदेश,<br>(दोन) दोषारोपाचे ज्ञापन व त्यासोबतची जोडपत्र- एक ते चार,<br>(तीन) सामाईक कारवाईच्या प्रकरणी नियम १२ अन्वये दिलेले आदेश,<br>(चार) जोडपत्र- चार मधील कागदपत्रांचे सुस्पष्ट व साक्षांकित संच,<br>(पाच) जोडपत्र- ३ मधील साक्षीदारांचे अद्ययावत पत्ते, दूरध्वनी/भ्रमणध्वनी क्रमांक, सेवानिवृत्त कर्मचाऱ्याच्या प्रकरणी त्याच्या निवासस्थानाचा पत्ता व दूरध्वनी/ भ्रमणध्वनी क्रमांक,<br>(सहा) अपचाऱ्याने दोषारोपपत्रास अनुसरून केलेले निवेदन असल्यास त्याची प्रत. असे निवेदन केले नसल्यास तसे स्पष्ट करावे.<br>(सात) जोडपत्र- चार मधील दस्तावेज व जोडपत्र- तीन मधील साक्षीदार कोणत्या दोषारोपांशी संबंधित आहेत याचे खालीलप्रमाणे विवरण: |

| दोषारोप क्रमांक | संबंधित दस्तावेज | संबंधित साक्षीदार |
|---|---|---|
| १ | २ | ३ |

| अ.क्र. | त्रुटी | स्पष्टीकरण |
|---|---|---|
| (३) | **दोषारोपाच्या ज्ञापनासोबतच्या जोडपत्रांत सुधारणा करताना त्यास शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याची मान्यता घेतली जात नाही.** | दोषारोपाचे ज्ञापन हे शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बजाविण्यात येते. म्हणून दोषारोपपत्रांमधील कोणतेही बदल/ सुधारणा या शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याच्या मान्यतेनेच करणे आवश्यक आहे. |
| (४) | **शिस्तभंगविषयक प्राधिकारी दोषारोप ज्ञापनावरील अपचाऱ्याच्या बचावाच्या निवेदनाचा काळजीपूर्वक विचार न करता चौकशी अधिकाऱ्याची नियुक्ती करतात. काही वेळेस दोषारोप ज्ञापन निर्गमित करतानाच चौकशी अधिकाऱ्याच्या नियुक्तीचे आदेशही निर्गमित केले जातात.** | दोषारोपाच्या ज्ञापनावर कर्मचाऱ्याने बचावाचे निवेदन सादर करण्यासंबंधीच्या महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ च्या पोट-नियम (४) मधील तरतुदीद्वारे कर्मचाऱ्यास नैसर्गिक न्याय तत्त्वानुसार बचावाची संधी देण्यात आलेली आहे. त्यामुळे कर्मचाऱ्याच्या बचावाच्या निवेदनाची तपासणी हा केवळ उपचार असणे अभिप्रेत नाही. शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने बचावाच्या निवेदनाची काळजीपूर्वक व कोणताही पूर्वग्रह न ठेवता न्यायबुद्धीने तपासणी करणे आवश्यक आहे. या संदर्भात विभागीय चौकशी नियमपुस्तिका, १९९१ च्या परिच्छेद- ३.१४ मधील तरतुदींकडे लक्ष वेधण्यात येत आहे. त्यानुसार बचावाच्या निवेदनाची काळजीपूर्वक तपासणी करुन दोषारोपाच्या बाबींचे पुनर्विलोकन करण्याची आणि आवश्यक वाटल्यास त्यांत सुधारणा करण्याची किवा काही/ सर्व दोषारोप वगळण्याची कार्यवाही शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने करणे आवश्यक आहे. या कार्यवाहीच्या आधारे पुढे चौकशी करावयाची आवश्यकता असल्यास चौकशी अधिकाऱ्याची नियुक्ती केली पाहिजे. |

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०१८०६२२१९०९४६६६०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhatu Sambhu Wankhede

Digitally signed by Bhatu Sambhu Wankhede
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=493af62b137d3b8ad2fb93133b4b083c9cafb89b6793bfa8d7ebb7ba735e6d9d, serialNumber=454f1eaad82ae32f06775522a32735d46dc9a815a777254a802deaa980512d11, cn=Bhatu Sambhu Wankhede
Date: 2018.06.25 16:28:10 +05'30'

**( भ.सं.वानखेडे )**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव,
२. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव,
३. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव,
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
५. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा,
६. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद,
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
९. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक,
१०. सर्व मंत्रालयीन विभाग,
११. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
१२. सर्व विभागीय आयुक्त,
१३. सर्व जिल्हाधिकारी,
१४. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
१५. *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१६. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१७. *सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
१८. *सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
१९. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२०. *आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),
२२. सर्व विधीमंडळ सदस्य,
२३. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),
२४. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२५. निवडनस्ती

----------

* पत्राने